**श्री. प्र. ग. गणवीर ,मुख्य अभियंता यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एपीपी-१११५/प्र.क्र.१७६/प्रशा-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: ०३ ऑक्टोबर, २०१५

वाचा :

1) सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन आदेश क्र. एपीपी-१११५/प्र.क्र.१७६/प्रशा-२, दि.१०.०९.२०१५
2) सामान्य प्रशासन विभागाचे अ.शा.पत्र क्रमांक-एईओ-१११५/१०/२०१५/१०, दि.३.१०.२०१५.

**शासन आदेश :**

श्री. प्र. ग. गणवीर, मुख्य अभियंता , राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई , सार्वजनिक बांधकाम विभाग, यांना वेतन बँड रु ३७४००-६७००० व ग्रेड वेतन रु.१०,०००/- या वेतन संरचनेत सचिव व सचिव समकक्ष पदावर खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर त्यांची पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग व शासनाच्या मान्यतेने सचिव (बांधकामे),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. प्र. ग. गणवीर यांची ही तदर्थ पदोन्नती आस्थापना मंडळाच्या शिफारशीनुसार व शासन मान्यतेनुसार त्यांची पदस्थापना वर नमूद केल्याप्रमाणे, त्यांच्या पदोन्नतीवर परिणाम करण्याची शक्यता असलेल्या यासंदर्भात न्यायालयात प्रलंबित असलेल्या सर्व याचिका , मूळ अर्ज , अवमान अर्ज व खालील न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

I. श्री.अ.ना.शंभरकर, (सेवानिवृत्त मुख्य अभियंता) यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ३/२०१४.

II. श्री. प्र. ग. गणवीर, मुख्य अभियंता, यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेली मूळ अर्ज क्रमांक ६४२/२०१४.

III. मुख्य अभियंता या स्थापत्य संवर्गाची दि.१०.०८.१९८८ ते दि.३१.१२.२०१४ या कालावधीची जेष्ठतासूची मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल करण्यात आलेले मूळ अर्ज क्र.७३२/२०१२ व मूळ अर्ज क्र.५३/२०१५ च्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात आली आहे.

IV. श्री. प्र.ग.गणवीर, मुख्य अभियंता यांनी मा उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली याचिका क्रमांक ४४६६/२०१४.

V. श्री. पंचगल्ले, (सेवानिवृत्त मुख्य अभियंता) यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली याचिका क्र. १०३१०/२०१३.

VI. मागासवर्ग कर्मचारी अधिकारी सुरक्षा महासंघ यांनी मा. उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल केलेली याचिका क्र. १०१५९/२०१३.मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मूळ अर्ज क्रमांक १२८९/ २०१० यामध्ये दिनांक ११.०३.२०१५ रोजी दिलेल्या न्याय निर्णयाच्या विरुध्द शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेली रिट याचिका क्रमांक ३८६५/२०१५.

VII. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.२७९७/२०१५.

३. श्री. प्र. ग.गणवीर यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००३१६३५०९०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sampat Dasharath Suryavanshi

Digitally signed by Sampat Dasharath Suryavanshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sampat Dasharath Suryavanshi
Date: 2015.10.17 16:32:14 +05'30'

**( सं. द. सुर्यवंशी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून),यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,महालेखापाल १ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
८) महालेखापाल २ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,नागपूर,
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०) निवासी लेखाधिकारी, मुंबई,
११) श्री. प्र. ग.गणवीर, मुख्य अभियंता,राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई ,सार्वजनिक बांधकाम विभाग
१२) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई,
१३) अपर मुख्य सचिव (सा.बां.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) अपर मुख्य सचिव (सेवा) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) सचिव (सा विस) , यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) सचिव (बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८) सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१९) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली-११० ००१,
२०) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, (सर्व) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई,
२१) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) उप सचिव व कार्यासन अधिकारी(का.९/का.९ अ/का. १०/का.१३/का. १६ ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) सर्व मंत्रालयीन विभाग,सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
२४) सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५) रोखशाखा (२ जादाप्रतीसह), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.